GR-200407301558180001-1201

अकराव्या वित्त आयोगाच्या निधीचे वाटप व विनियोगाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांकः आविआ २००२/प्र.क्र. ०६/२४-अ**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १४ मार्च २००२.**

**प्रस्तावना-**

केंद्र शासनाच्या अकराव्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांच्या बळकटीकरणासाठी सन २००० ते २००५ या पाच वर्षांसाठी प्रत्येक वर्षी रुपये १३१.३५ कोटी निधी केंद्र शासनाकडून राज्य शासनाला मिळणार आहे. केंद्र शासनाच्या शिफारशीनुसार सदरचा निधी लोकसंख्या , भौगोलिक क्षेत्रफळ, विकेंद्रीकरणाचा निर्देशांक, सरासरी दरडोई उत्पन्नापासून जिल्हयाच्या दरडोई उत्पन्नाची तफावत व पंचायत राज संस्थेचे स्वतःचा महसूल वाढविण्याचे प्रयत्न या निकषावर आधारित सूत्रानुसार वितरीत करावयाचा आहे. तसेच सदरचा निधी अकराव्या वित्त आयोगाच्या निधी वापराच्या मार्गदर्शक तत्वामधील परिच्छेद २.१ मधील योजनांवर खर्च करावा अशा सूचना केंद्र शासनाने दिलेल्या आहेत. उपरोक्त दोन्ही बाबींचा विचार करून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**निर्णय-**

**१) निधीचे वाटप -**

अकराव्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार प्रत्येक वर्षी मिळणारा रू. १३१.३५ कोटी निधीपैकी लेखा, लेखापरिक्षण व डाटाबेससाठीचा राखीव निधी वगळून उर्वरीत निधी जिल्हा परिषदांमध्ये खालील निकषांच्या आधारे वाटप करण्यात यावे.

| निकष | टक्केवारी |
|---|---|
| १) जिल्हयाची ग्रामीण लोकसंख्या ( जि.प. हद्दीतील ) | ५०% |
| २) राज्याच्या सरासरी दरडोई उत्पन्नापासुन तफावत | २०% |
| ३) स्वउत्पन्न वसुलीचे प्रयत्न | १०% |
| ४) जिल्हयाचे क्षेत्रफळ (जि. प. चे) | २० % |

उपरोक्त निकषाच्या परिगणनेसाठी आवश्यक असणारी माहिती संचालक अर्थ व सांख्यिकी संचालनालय व जिल्हा परिषदांकडून घेण्यात येईल.

**२) निधीचा विनियोग :-**

अकराव्या वित्त आयोगाच्या प्रत्येक वर्षाच्या रु. १३१.३५ निधीपैकी रू. ११.१७२० कोटी इतका निधी ग्राम पंचायत व पंचायत समितीच्या लेखा व लेखा परिक्षणासाठी राखीव ठेवण्याचा आहे. याच प्रमाणे पंचायत राज संस्थांच्या वित्त विषयक बाबींचा डाटा बेस तयार करण्यासाठी पाच वर्षात एकूण रु. २२.३०३४ कोटी (म्हणजे वार्षिक रू ४.४६०७ कोटी) निधी राखीव ठेवण्याचा आहे. याप्रकारे

राखीव ठेवण्याचा एकूणवार्षिक निधी रुपये १५.६३२७ कोटी इतका येतो. राखीव निधी वगळल्यानंतर उर्वरित निधी रुपये ११५.७६७३ कोटी इतका येतो. हा निधी परिच्छेद एक मधील निकषानुसार जिल्हा परिषदांना वितरित करावयाचा आहे.

सदरचा निधी पंचायत राज संस्थांनी ग्रामीण क्षेत्राच्या सामाजिक सेवा व सुविधांसाठी खर्च करावयाचा आहे. यामध्ये प्रामुख्याने प्राथमिक शिक्षण, प्राथमिक आरोग्य सेवा, स्वच्छ पाणी पुरवठा, दिवाबत्ती, स्वच्छता, गटार व मलनिस्सारण,दहन व दफन भुमी व्यवस्थापन, सार्वजनिक सुविधा व इतर सार्वजनिक मालकीच्या वित्तीय स्त्रोतांचे संवर्धन या बाबी असाव्यात. सदरहू बाबी संबंधित योजना बनवत असतांना पंचायत राज संस्थांनी खालील तत्वांचे पालन करावयाचे आहे.

अ) ज्या योजनांना केंद्र , राज्य व इतर संस्थांकडून निधी दिला जात नाही अशा योजना या निधीतुन घेण्यात याव्यात. तसेच घेण्यात येणारी योजना ही पूर्णतः या निधीमधूनच पूर्ण व्हावी अशी असावी.

ब) या निधीचा वापर पगार व भत्ते देण्यासाठी व कार्यालयीन खर्चासाठी करता येणार नाही.

क) या निधीमधुन देखभाल व दुरूस्तीसाठी खर्च करता येणार नाही.

ड) राज्य व केंद्र शासनाने बंदी घातलेल्या बाबींवर यामधुन खर्च करता येणार नाही.उदा. वाहन खरेदी

इ) आदिवासी व पारंपारीक मागासलेल्या भागांना प्राधान्य देण्यात यावे.

ई) निधी वितरीत झाल्यापासुन एक वर्षाच्या आत निधी खर्च करावा व एक वर्ष संपल्यानंतर निधी वापराची उपयोगीता प्रमाणपत्रे विहीत नमुन्यात शासनास सादर करावीत.निधी वापराची उपयोगीता प्रमाणपत्रे विहीत वेळेत सादर करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील. जर विहित वेळेत उपयोगिता प्रमाणपत्रे सादर केली नाही तर सदर रक्कम पंचायत राज संस्थांकडून पूर्णतः वसुल करुन घेण्यात येईल.

सदरहू अनुदान अबांधील **(Untied)** स्वरुपात म्हणजेच राज्य शासनाने स्वतः योजना ठरवून न देण्यापाठीमागील हेतू हा पंचायत राज संस्थांना अधिक स्वयंनिरर्भर करण्याचा आहे. की ज्यामुळे संस्था स्वतःच्या गरजा ओळखून त्यासाठी योग्य नियोजन करुन योजना ठरवतील व त्याची अंमलबजावणी करतील. ग्रामीण क्षेत्राच्या विकास प्रक्रियेत पंचायत राज संस्थांना निर्णय घेण्यास वाव याव्दारे देण्यात येत आहे.

आवश्यकतेनुसार या व्यतिरिक्त योजनेमध्ये काही बदल करावयाचा असल्यास शासन यथावकाश सूचना देईल. जिल्हा परिषदांनी निवडलेल्या योजनांची माहिती ग्राम विकास विभागाला द्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( एस्. एस्. हुसेन )
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) प्रधान सचिव , वित्त विभाग , मंत्रालय,मुंबई

२) प्रधान सचिव , नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई

३) विभागीय आयुक्त (सर्व)

४) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व )

५) अध्यक्ष , जिल्हा परिषद (सर्व )

६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

७) उप सचिव (ग्राम विकास विभाग) सर्व

८) कार्यासन अधिकारी (सर्व) ग्राम विकास व जलन संधारण विभाग,मंत्रालय,मुंबई

९) महालेखापाल,मुंबई

१०) महालेखापाल, नागपुर

११) मुख्य लेखा परिक्षक ,स्थानिक निधी लेखा कार्यालय

१२) निवड नस्ती कार्यासन क्रमांक २४-अ, ग्राम विकास व जल संधारण विभाग,मंत्रालय,मुंबई